नक्षलग्रस्त भागाच्या विकासाचा विशेष कृती कार्यक्रम
सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात गडचिरोली, गोंदिया , चंद्रपूर व भंडारा या जिल्हयांकरिता असलेल्या जिल्हा समन्वय समितीस निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नक्षल २४१४/प्र.क्र.११० /का.१४१७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २१ नोव्हेंबर, २०१४.

वाचा :

१) **शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक : नविका १००९/प्र.क्र.६८/ का.१४१५, दिनांक १७.१२.२००९ व दिनांक २७.०१.२०१०.**

प्रस्तावना :

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा या जिल्हयातील नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीने निराकरण करण्यासाठी प्रति जिल्हा रु.३.०० कोटी नियोजन विभागामार्फत उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर निर्णयास अनुलक्षून जिल्हाधिकारी, गडचिरोली, गोंदिया , चंद्रपूर व भंडारा यांना सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

१. गडचिरोली, गोंदिया , चंद्रपूर व भंडारा या जिल्हयांतील विशेषत: नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे निराकरण करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या समितीस संदर्भाधीन शासन निर्णयासोबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या आधारे सामूहिक लाभाच्या योजना/सुविधा निवडून स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीचे निराकरण करणे शक्य व्हावे यासाठी पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | सन २०१४-१५ मध्ये द्यावयाचा निधी (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | गडचिरोली | **२००.००** |
| २ | गोंदिया | **२००.००** |
| ३ | चंद्रपूर | **२००.००** |
| ४ | भंडारा | **२००.००** |
| | **एकण** | ८००.०० |

**(एकूण रुपये आठशे लक्ष फक्त)**

२. उपरोक्त निधी हा संबंधित जिल्हाधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यात यावा. सदरहू निधी खर्च करताना त्या निधींपैकी कमीत कमी ७५% निधी नक्षलग्रस्त भागाच्या “अतिदुर्गम व अतिसंवेदनशील” या

क्षेत्रामध्ये खर्च करण्यात यावा. यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कामाच्या निवडीसाठी परिच्छेद ६, ७, ८ व ९ मधील, अंदाजपत्रक व मंजूरीसाठी परिच्छेद १० मधील, निधी वितरणासाठी परिच्छेद १२ व १३ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. उपरोक्त निधी हा लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सेक्रेटरीएट - आर्थिक सेवा, ०९०, सेक्रेटरीएट (०१) नियोजन विभाग, (०४) (०१) नक्षलवादी भागासाठी विशेष कृतीदल(योजनांतर्गत), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (३४५१०६५४) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी कोषागार कार्यालयातून आहरीत व संवितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी राहतील, तसेच संबंधित जिल्हा नियोजन अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३९७ /१४/व्यय-८, दिनांक ०६ /०८/२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२११५२११२९५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2014.11.21 15:29:41 +05'30'

**( वसंत कुळकर्णी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विभागीय आयुक्त,नागपूर.
७. जिल्हाधिकारी, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा.

८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा.
९. जिल्हा पोलिस अधीक्षक, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा.
१०.उप आयुक्त (नियोजन) विभागीय आयुक्तांचे कार्यालय, नागपूर.
११.उप वन संरक्षक, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा.
१२.जिल्हा नियोजन अधिकारी, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा..
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा.
१४.प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा.
१५.वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१६.कार्यासन अधिकारी (का. १४११/१४१४/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
१७.निवडनस्ती, कार्यासन १४१७.